**महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाकरिता संगणक सामग्री खरेदी करण्यास रु.७,३८,९५७/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- २०२५/प्र. क्र.०२/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-** १) महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.मप्रशावि/सीओआरएस-३/०४/०१/सन२०२५, दि.०७.०१.२०२५ रोजीचे पत्र. तसेच अधिक्षक, महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मप्रशावि/सीओआएस-३/४८/०२/सन २०२५, दि.१८.०२.२०२५ रोजीचे पत्र.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III, दि.०१.१२.२०१६.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७ व दि.०८.१२.२०१७.

**प्रस्तावना :-**

महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाकरीता १२ संगणक, ०६ प्रिंटर्स व ०२ स्कॅनर इतक्या संगणक सामग्री खरेदीचा प्रस्ताव संदर्भ क्र. १ येथील दि.१८.०२.२०२५ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने अभिप्राय दिले आहे. सदर प्रस्तावांतर्गत खर्च रु.१० लक्ष पेक्षा कमी असल्याने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०१.१२.२०१६ मधील सुधारित नियम पुस्तिकेतील मुद्दा क्र.२.९.२ नुसार विभागाच्या खरेदीच्या विहित कार्यपद्धती संदर्भात “जर खरेदीचे अंदाजित मूल्य रुपये दहा लाखापेक्षा (रु.१० लाख) कमी असेल तर, विभाग प्रमुखांना खरेदीसंबंधी प्रशासकीय विभागीय खरेदी समितीची बैठक न बोलविता निर्णय घेण्याचा अधिकार आहे”. यानुषंगाने महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाकरीता १२ संगणक, ०६ प्रिंटर्स व ०२ स्कॅनर इतकी संगणक सामग्री खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाकरीता १२ संगणक, ०६ प्रिंटर्स व ०२ स्कॅनर इतकी संगणक सामग्री खरेदी करण्यास रु.७,३८,९५७/- (अक्षरी रुपये सात लक्ष अडतीस हजार नऊशे सत्तावण्ण फक्त) इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संगणक सामग्री खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | संगणक सामग्री | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | संगणक | १२ | रु.४५,५००/- | रु.५,४६,०००.००/- |
| २ | प्रिंटर | ०६ | रु.२२,१८४.३३/- | रु.१,३३,१०६.०२/- |
| ३ | स्कॅनर | ०२ | रु.२९,९२५.७२/- | रु.५९,८५१.४५/- |
| | **एकूण** | | | **रु.७,३८,९५७.४७/-** |

३. सदर संगणक सामग्री खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. २४/०८/२०१७ व ०८/१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी. सदर संगणक सामग्री खरेदी करतांना उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीच्या सुधारित नियम पुस्तिकेतील तरतुदींचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची आहे.

४. उपरोक्त संगणक सामग्रीची खरेदी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने दिलेल्या “Specifications of the mentioned are generic. However, OEM make and modal to be removed from specification and allow more OEMs to participate”, अभिप्रायानुसार करण्यात यावी.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार त्याचप्रमाणे प्रधान सचिव व विधि परामर्शी तथा प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१५१५२९२४५५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2025.04.15 15:30:50 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
९. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१०. कार्यासन अधिकारी, कार्या.- १,२३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती/का. ७